**राष्ट्रीय आरोग्य अभियानांतर्गत राज्यातील आरोग्य संस्थामध्ये Laboratory Services (Free Pathological Services) सेवा बाह्य संस्थेमार्फत उपलब्ध करुन देण्यासाठी निविदा प्रक्रियेस प्रशासकीय मान्यता मिळणेबाबत...**

**महाराष्ट्र शासन**
**सार्वजनिक आरोग्य विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः प्रशामा-१२२१/प्र.क्र.३१/आरोग्य-७**
१० वा मजला, गो. ते. रूग्णालय संकूल इमारत,
नवीन मंत्रालय, मुंबई - ४००००१.
दिनांक : २५ ऑक्टोंबर, २०२१.

वाचा :-

१) सहसंचालक (रुग्णालये), आरोग्य सेवा, आरोग्य सेवा आयुक्तालय, मुंबई यांचे पत्र क्र.राआसो/आयपीएचएस/४२५८९-५९५/२०२१, दिनांक ०५.०८.२०२१.
२) आयुक्त, आरोग्य सेवा तथा अभियान संचालक, राष्ट्रीय आरोग्य अभियान, मुंबई यांची मान्यता प्राप्त टिप्पणी दिनांक ०४.०८.२०२१.
३) राज्यातील आरोग्य संस्थांमध्ये लॅबोरेटरी सर्विसेस देण्यासाठी संचालक, आरोग्य सेवा, मुंबई आणि मे. एचएलएल लाइफकेअर लि. यांच्या सोबतचा दिनांक ०३.०२.२०१७ रोजीचा करार.

प्रस्तावना:-

केंद्र शासनाच्या मार्गदर्शक सूचनेनुसार Free Diagnostic Scheme या योजनेंतर्गत राज्यातील आरोग्य संस्थामध्ये Laboratory Services बाह्य संस्थेमार्फत उपलब्ध करुन देण्यासाठी विहित प्रक्रिया राबवून मे.एचएलएल लाइफकेयर लि. यांच्यासोबत दिनांक ०३.०२.२०१७ रोजी ५ वर्षाकरीता करण्यात आला होता. सदर कराराची मुदत दिनांक ०२.०२.२०२२ रोजी संपुष्टात येणार असल्याने राज्यातील आरोग्य संस्थामध्ये Laboratory Services बाह्य संस्थेमार्फत उपलब्ध करुन देण्यासाठी नवीन सेवा पुरवठादार नेमण्याकरीता निविदा प्रक्रिया करण्यास प्रशासकीय मान्यता प्रदान करण्याबाबत सहसंचालक (रुग्णालये), आरोग्य सेवा, आरोग्य सेवा आयुक्तालय, मुंबई यांनी संदर्भ क्र.१ अन्वये विनंती केली आहे. सन २०२१-२२ करीताच्या पी.आय.पी. मध्ये FMR Code ६.४.१. अंतर्गत राज्यातील आरोग्य संस्थांमध्ये Laboratory Services पुढे चालू ठेवण्याकरीता नवीन सेवा पुरवठादाराद्वारे सेवा पुरविण्यासाठी निविदा प्रक्रिया राबविण्यास प्रशासकीय मान्यता देण्याबाबतची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

राज्यातील आरोग्य संस्थांमध्ये Laboratory Services सेवा सुरळीत चालू ठेवण्याकरीता निविदा प्रक्रियेमार्फत नवीन सेवा पुरवठादाराद्वारे सेवा पुरविण्याकरीता पुढील ५ वर्षाच्या कालावधीसाठी निविदा प्रक्रियेस पुढील अटी व शर्तीच्या अधीन राहून प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे. :-

१) सदर लॅबोरेटरी सर्विसेसकरीता आवश्यकता / मागणी याची शहानिशा / खातरजमा करण्यात यावी. त्यानंतरच सदर बाबींच्या खरेदीसाठी ई-निविदा प्रक्रिया राबविण्यात यावी. सदर ई-निविदा प्रक्रिया आयुक्तालयातील खरेदी कक्षामार्फत राबविण्यात यावी.

२) लॅबोरेटरी सर्विसेसचे विनिर्देश गरजेनुसार व अद्ययावत असल्याची खातरजमा करण्यात यावी. लॅबोरेटरी सर्विसेसकरीता आवश्यक त्या बाबींचे तांत्रिक विनिर्देश (Technical specification) संबंधित तज्ञांनी (तांत्रिक समिती / अधिकारी) यांनी मान्य केलेल्या विनिर्देशानुसार असावेत. तसेच, सदर तांत्रिक विनिर्देश (Technical specification) हे कोणत्याही विशिष्ट कंपनीला फायदा होईल अशा रितीने तयार केलेले नसल्याबाबत खातरजमा करण्यात यावी. पीआयपी मध्ये मंजूर असलेल्या बाबींच्या तांत्रिक विर्निदेशानुसार मागणीपत्र पाठविण्याची जबाबदारी संबंधीत कार्यक्रम प्रमुखांची राहिल. प्रस्तावातील समाविष्ट असलेल्या बाबींचीच खरेदी करण्यात यावी.

३) या प्रकल्पामध्ये राज्यातील प्राथमिक आरोग्य केंद्र-१८३९, नागरी प्राथमिक आरोग्य केंद्र-६५१, ग्रामिण रुग्णालय- ३६२, उपजिल्हा रुग्णालय (५० व १०० खाटा)- ९२, जिल्हा रुग्णालय- २३, सामान्य रुग्णालय- ८, स्त्री रुग्णालये- १५, मनोरुग्णालये- ४, क्षयरोग रुग्णालये- ५, कुष्ठरोग रुग्णालये- ४, संदर्भसेवा रुग्णालये- २, ऑर्थो रुग्णालये- १ या आरोग्य संस्था समाविष्ट असणार असून त्या व्यतिरिक्त वेळोवेळी नव्याने कार्यान्वित होणाऱ्या आरोग्य संस्था यांचा समावेश सदर प्रकल्पांतर्गत करण्यात येईल.

४) केंद्र शासनाच्या Free Diagnostic Scheme च्या मार्गदर्शक सूचनेनुसार जिल्हा रुग्णालय स्तरावर- १३४, ग्रामीण रुग्णालय स्तरावर-(SDH ५०+ RH)- ९७ तसेच प्राथमिक आरोग्य केंद्रस्तरावर- ६३ चाचण्यांचा आणि स्थानिक / राज्याच्या आवश्यकतेनुसार तज्ञांनी सुचविलेल्या चाचण्यांचा समावेश सदर प्रकल्पांतर्गत करण्यात यावा.

५) सदर प्रकल्पाकरीता अंदाजित रु.१८०.०० कोटी इतका वार्षिक खर्च अपेक्षित असून त्यामध्ये दरवर्षी ३ टक्के वार्षिक दरवाढ लागू राहील.

६) सदर प्रकल्पासाठी सेवा पुरवठादार यांनी ठरवून दिलेल्या वेळेत आरोग्य संस्थामधील रुग्णांचे नमुने (रक्त/लघवी/स्टूल/सीएसएफ इ.) घेण्यासाठी फ्लेबोटॉमीस्टची नियुक्ती करावयाची आहे. तसेच सेवा पुरवठादाराने राज्यात विविध ठिकाणी लॅबोरेटरी स्थापित करावयाच्या आहेत व

करारात ठरवून दिलेल्या चाचण्या विहित वेळेत सदरील लॅबोरेटरीज मध्ये करुन अहवाल संस्थांना उपलब्ध करुन द्यावयाच्या आहे.

७) शासन निर्णय, उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, क्र. भांखस-२०१४/प्र.क्र.८२/भाग-III/ उद्योग-४, दिनांक १ डिसेंबर, २०१६ अन्वये प्रसिध्द करण्यात आलेल्या शासकीय विभागांनी करावयाच्या कार्यालयीन खरेदीसाठीच्या कार्यपध्दतीची सुधारीत नियमपुस्तिका यामधील तरतूदीनुसार विहित खरेदी प्रक्रिया राबविण्यात यावी.

८) सदर सर्विसेसकरीता बाह्यसेवा पुरवठादाराची निवड करतांना GEM Portal, इतर राज्यांचे दरकरार, National Pharmaceutical Pricing Authority (NPPA) यांच्याकडील उपलब्ध असलेला न्युनत्तम दर विचारात घेण्यात यावेत. तसेच हाफकिन संस्थेमार्फत सदर बाबींची सेवा उपलब्ध करुन दिली जात असल्यास अथवा झालेली असल्यास निविदेत प्राप्त झालेले न्युनत्तम दर विचारात घेऊन त्या दरांना अंदाजित दर म्हणून गृहित धरण्यात यावे व त्यानूसार निविदेकरीता मागणी नोंदवितांना औषधी, औषधी साहित्य व उपकरणांच्या संदर्भात अंदाजित दर म्हणून नोंदविण्यात यावेत व खरेदी प्रक्रियेअंती दर निश्चित करण्यात यावा. सदर दर हा बाजार भावापेक्षा कमी असल्याबाबत आणि संबंधित पुरवठादाराने या बाबीचा इतर ठिकाणी ज्या दराने पुरवठा केला आहे, त्या दरापेक्षा जास्त नसल्याबाबत खातरजमा करण्यात यावी.

९) लॅबोरेटरी सविर्सेसकरीता बाह्यसेवा पुरवठादाराची निवड करतानांच्या निविदा दस्तऐवजात समाविष्ट करावयाच्या कामाचा गोषवारा व सेवेच्या अटी, शर्तीबाबतचे नियम आयुक्तालयाकडील अस्तित्वात असलेल्या निविदा दस्तऐवज छाननी समितीमार्फत अंतिम करुनच निविदा विषयक पुढील कार्यवाही करण्यात यावी.

१०) राष्ट्रीय आरोग्य अभियानांतर्गत सन २०२१-२२ या आर्थिक वर्षातील केंद्र शासनाने मंजूर केलेल्या कृती आराखडयामध्ये FMR Code ६.४.१ या शीर्षांतर्गत सदर बाबीच्या विनियोगाकरीता एकूण रु.१२५४९.२३ लक्ष इतकी रक्कम मंजूर करण्यात आलेली आहे. त्याप्रमाणे सदर प्रकल्पाकरीता आवश्यक असणाऱ्या निधीची मागणी केंद्र शासनाकडे राष्ट्रीय आरोग्य अभियानाच्या पी.आय.पी.मध्ये दरवर्षी करण्यात यावी. तसेच अनुदानाच्या विहित मर्यादेतच भागविण्यात यावा. सदरची बाब प्रशासकीय मंजुरीच्या विहित कालावधीत पूर्ण होईल याची दक्षता घ्यावी. याबाबतची संपूर्ण जबाबदारी कार्यक्रम प्रमुखांची राहील.

११) तसेच, या बाबींच्या खरेदी द्विरुक्ती (Duplication) होणार नाही, याची दक्षता घेण्यात यावी.

१२) संपूर्ण खरेदी प्रक्रिया राबविताना केंद्रिय दक्षता आयोगाच्या मार्गदर्शक सूचनांचे (CVC Guidelines) तंतोतंत पालन करण्यात यावे.

१३) शासन निर्णय, वित्त विभाग, क्र. विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/भाग-२/२०१३/विनियम, दिनांक १७ एप्रिल, २०१५ सोबतच्या परिशिष्टातील वित्तीय अधिकार नियम पुस्तिका १९७८, भाग-पहिला

उपविभाग-दोन मधील अ.क्र.४ नियम क्र.७ समोरील स्तंभ क्र.६ येथील अटींची पूर्तता करण्यात यावी.

१४) खरेदी प्रक्रिया पूर्ण झाल्यानंतर खरेदी समितीच्या मान्यतेनंतरच पुरवठा आदेश निर्गमित करण्यात यावेत.सदर प्रकरणी सार्वजनिक आरोग्य विभाग शासन निर्णय क्र.खरेदी - २०१६/प्र.क.२४०/आरोग्य-८, दिनांक २६ जुलै, २०१७ च्या शासन निर्णयातील तरतूदीनुसार कार्यवाही करण्यात यावी.

०२. उपरोक्त अनुक्रमांक १ ते १४ येथे नमूद अटींची पूर्तता करण्याची व खरेदी नियमानुसार व आवश्यकते प्रमाणे आहे हे सुनिश्चित करण्याची संपूर्ण जबाबदारी आयुक्त (आरोग्य सेवा) तथा अभियान संचालक, राष्ट्रीय आरोग्य अभियान, मुंबई, संचालक (आरोग्य सेवा), आरोग्य सेवा संचालनालय, मुंबई, सहसंचालक, आरोग्य सेवा (खरेदी कक्ष), आरोग्य सेवा संचालनालय, मुंबई व कार्यक्रम प्रमुख यांची राहील.

०३. शासन निर्णय, वित्त विभाग, क्र.विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/१३/विनियम, भाग-२, दिनांक १७ एप्रिल, २०१५ मधील वित्तीय अधिकार नियम पुस्तिका १९७८ भाग-पहिला उपविभाग-दोन मधील अनु क्रमांक ४, नियम क्र. ७ अन्वये प्रशासनिक विभागास पूर्ण अधिकार प्रदान करण्यात आले आहेत, त्यानुसार सदर शासन निर्णय निर्गमित करण्यात येत आहे.

०४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२११०१२१३२९३२६९१७ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

SOMNATH VASANT POTARE

Digitally signed by SOMNATH VASANT POTARE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=PUBLIC HEALTH DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=4d677dcd1bc3bed55a48ddbdaad925a6651c5d43a12d84cf305d3ff791ea7f16, pseudonym=2F7DD6849F376E58DE2CF34A8700B81E11CB58E0, serialNumber=17E9C3C1EF20B007FEFC5A1F1EC0E69F061648D4F897D5822E9F0E56899502E0, cn=SOMNATH VASANT POTARE
Date: 2021.10.25 11:56:08 +05'30'

**( सोमनाथ पोटरे )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

प्रत:-

१) आयुक्त, आरोग्य सेवा तथा अभियान संचालक, राष्ट्रीय आरोग्य अभियान, मुंबई.
२) अतिरिक्त अभियान संचालक, राष्ट्रीय नागरी आरोग्य अभियान, मुंबई.
३) संचालक (वित्त व लेखा), राष्ट्रीय आरोग्य अभियान, मुंबई.
४) संचालक १ व २, आरोग्य सेवा, मुंबई व पुणे.
५) सहसंचालक, आरोग्य सेवा (खरेदी कक्ष), मुंबई

६) सर्व सह संचालक (आरोग्य सेवा संचालनालया मार्फत)
७) सर्व सहसचिव/उपसचिव, सार्वजनिक आरोग्य विभाग.
८) उप संचालक, सर्व मंडळ कार्यालये.
९) सर्व जिल्हा शल्य चिकित्सक (FWB मार्फत)
१०) सर्व जिल्हा आरोग्य अधिकारी (FWB मार्फत)
११) निवडनस्ती (आरोग्य-७)